


हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी.. netaksharee@gmail.com



“गुरू परमात्मा परेशु” म्हणतात –

कारण गुरू परमात्म्याचे स्वरूप मानले जाते .

‘गु’ अंधःकार दर्शवतो आणि ‘रू’ प्रकाश, म्हणूनच अंधाराचा नाश करून प्रकाशाकडे नेणारा तो “गुरू” जो आपल्या आयुष्यातील अंधार दूर करून प्रकाश वाटेकडे नेतो ………

संत कबीर म्हणतात :

“गुरू गोविंद दोहू खडे, किसको लागू पाय ।
बलीहारी गुरूदेव की जिन्हे गोविंद दियो दिखाय ।। ”

म्हणजे गुरू आणि देव असे दोन्ही समोर उभे दिसले आणि कोणाला पहिल्यांदा वंदन करावे हा प्रश्न पडला, तेव्हा त्या गुरूचेच आभार मानावे लागले ज्यामुळे देवदर्शन घडले.

‘गुरू पौर्णिमा’ जगतगुरू व्यास यांचा हा जन्मदिवस,
त्यांना नेटाक्षरी तर्फे मानवंदना !!!

**संपादक**

सोनाली घाटपांडे ( पुणे )

**अतिथी संपादक**

सौ. संजीवनी बोकील (पुणे)

**सह संपादक**

स्वप्ना कोल्हे ( नाशिक )

सारंग भणगे ( पुणे )

अहं ब्रह्मास्मि ( पुणे )

सचिन काकडे ( मुंबई )

भारती सरमळकर ( मुंबई )

**जगतगुरू व्यासांबरोबरच ज्या 'गुरूला' साक्षात 'परब्रह्म' मानले गेले त्या दत्तगुरूंना वंदन !!!**

**दत्तगुरु …………**

तो सृष्टीचा कर्ता, तो त्रैलोक्याचा पिता,

तो कैलासाचा पती दत्तगुरु।

दत्त मायेचे आगर, दत्त सुखाचा सागर,

दत्त कृपासिंधू माय माझी ।

नाम दत्ताचे स्मरता भय नसे काही,

आईच्या कुशीचे सुख भासे ।

दत्त माझे गुरु दत्त कल्पतरु,

दत्त हेच बंधू आणि सखा ।

कृपा त्यांची रे घडता होशी तू निवांत,

काळजी तुझी घेती दत्तगुरु ।

गुरुंचे वाक्य हे ब्रीद धरी साच,

भवसागरी तारुन नेतील तुज ।

**सोनाली घाटपांडे**

# <u>करुण रस काव्यस्पर्धा निकाल</u>

नवरसरंग काव्यस्पर्धे अंतर्गत "करूण रस" या विषयासाठी एकंदर १२५ कविता आल्या , त्यातून कौतुकपात्र ठरलेल्या कविता सादर करत आहोत -

## प्रथम क्रमांकाची कविता - रुसला गं विठा



जोंधळ्याचे दान
पदरी फाटक्या
गोंधळ्याचे भान
जागरी हिरव्या

कोरड्या काठांनी
एकटी चंद्रभागा
चुकली गं वारी
रुसला गं विठा

मिरगाचा पान्हा
कोरडा आटला
आसवांचा पाट
भरुन वाहिला

ढवळ्या संगती
धनी गं जुंपला
चिमण्या चोचींनी
पवळ्या विकला

वांझोटे गं खळे
औंदाच्या सुगीला
विझल्या चूलीचे
चटके पोटाला

तिरडीच्या दिंडी
हरिनाम सोहळा
पंढरीच्या वाटी
उपाशी कावळा

**-- भूषण किनगावकर (क्लोरोफॉर्म )**

## द्वितीय क्रमांकाची कविता – मन कावरं-बावरं

मन कावरं-बावरं
तुझ्या एका श्वासासाठी
तुझा एक एक शब्द
माझी गीता माझी पोथी

तुझा हुंकार झंकार
जशी सरस्वती वीणा
तुझ्या वाणीचा गोडवा
वेणू मधुबन कान्हा

तूच पाठराखी माझी
तूच माझी आदि-शक्ती
मन कावरं-बावरं
तुझ्या एका श्वासासाठी

डोळे यातना व्याकुळ
पाणी माझ्या काळजाचं
वाट दिसता दिसेना
जसं नभ मळभाचं

गळपटलेले पाय
शून्य वजाबाकी हाती
मन कावरं-बावरं
तुझ्या एका श्वासासाठी

असा यल्गार मांडला
आकांताने फोडी टाहो
तरारले अश्रू मनी
पान्हा पत्थराला लाहो
सारा लिलाव मांडला
होते नव्हते ते गाठी

मन कावरं-बावरं
तुझ्या एका श्वासासाठी
मन कावरं-बावरं
तुझ्या एका श्वासासाठी

**-- नाम गुम जायेगा**

# करुण रस काव्यस्पर्धा निकाल

## तृतीय क्रमांक (**विभागून**)



**प्रिय बाबांस,**

आज इतक्या दिवसांत जाणवलं बरंच काही
म्हणजे सगळं तसं जुनंच, सवयीचं,
पण नव्याने उमगलेलं....

तुमच्या पाडसाने केलिय सवय एकट्याने निजण्याची
कारण अंगाईतला चंदामामा झालाय केंव्हाच पसार
निंबोणीच्या झाडामागून....

पहाटेचा पहिला चहा मात्र अजुनही करत नाही गोडव्याशी दोस्ती
त्याची जवळीक केवळ तुमच्या को-या पथ्याशी....

भूमितीतली समिकरणं वागायला लागलीत शहाण्यासारखी
अन अपुर्णांकात उत्तरं द्यायल्या लागल्यात भाबड्या बेरजा-
वजाबाक्या....



श्रावणात तुमचे बोट धरुन येणारा गणपतिबाप्पा,
झालाय तुमच्या आरतीविना पोरका,
अन दिवाळसण झालाय दारच्या कंदिलाला पारखा....

बाबा आठवतंय ना तुम्हाला?
गावच्या आंब्याचा मोहोर तर केंव्हाच ओसरुन गेलेला....
पण तुमच्या मैत्रीला जागणा-या केळीच्या बागादेखील झाल्यात
कोरड्या आताशा....

दरवाज्यातल्या तुमच्या चपला आता विसावल्या आहेत माळ्यावर
कायमच्या....
अन त्या कोप-यात सरकवलेलं माझं बालपण,
अजुनही पहातंय वाट, लिंबोणीमागच्या चंदामामाची....

**-- संयोगिता**

# करुण रस काव्यस्पर्धा निकाल

## तृतीय क्रमांकाच्या कविता **विभागून**

**शेतक-याच पोर**

सांजी येतो म्हनुन बाप माहा गेला
चार लोकांच्या खांद्यावर त्याचा देह परत आला!
माय गा म्हायी सजुन दारात बसली
कुकु तिचं पुसण्या खुद्द यमराज आला........
बापाले पाहुन मायनं टाहो फोडला
तरी त्या निष्ठुरान नाही पाउस पडला
बापाची माह्या आंगोळ घालण्या पाणी तवा नव्हतं
म्हनुन शीण्या म्हने माह्या बाप नरकातच गेला.......
बापाकडे पाहून माय जिवाचा अकात करत व्हती
आन दुस-या मयतीत जाचं म्हनुन लोक घाई करत व्हती
इथं जो झाला तोच खेय तियभी झाला व्हता
कर्जापायी एका कास्तकाराचा पुन्हा जीव गेला व्हता........
तेरविचा मह्या बापाच्या काय म्हनता थाट
साता-जलमाच्या भुकेल्यायचा उलटुन आला व्हता लाट
पोटात पडल्यावर होतं सा-यायचं दोन दिसाचं भागलं
आन त्यायच्या चेह-यावर समाधान पाहून माह्या
मायचं गाहान मंगयसुत्र सरथकी लागलं........
सरकारनं दाखवलेल्या आशेपायी
कोर्ट-कचेरीच्या चकरा मारतो हाहे
पोटात टाकाले पैका नाही पर वकिलांचे खीशे भरतो आहे
नुकसानभरपाई पाहिजे असन त बाप कास्तकार व्हता हे
सिद्ध करा म्हणते
काऊन केली आत्महत्या हे त्याच्या भटकत्या आत्म्याले
ओरबडुण इचारा म्हणते........
माह्या वावरातल्या मातीचा वास घेऊन पहा
काम करताना माह्या बापाच्या गायलेल्या
घामाचा सुगंध तुमले येइल
माह्या बापाचा जिव असलेल्या वावरात एकदा वखरूण पहा
त्यात त्याचं मिसयलेलं रक्त बाहेर येईल
कोर्ट-कचेरीचा नाद सोडुन मी आता वावराकड वयलो हाहे
मायचं गाहन मंगयसुत्र सोडवाया
माह्या एका बैलासंगं जुतलो हाहे....
पन नेहमी मनात एकच इचर येते,
असाच काम करता-करता मी बी एक दिस सरनार
चार मानसांच्या खांद्यावर सवार हुन मी आपल्या घरी जानार........



**-- विनय शिवहरी विरखरे**

# करुण रस निकाल

## उत्तेजनार्थ – काजळडोह

कृष्णकाळी रात्र अन दिवसही सावळा
उजेडाच्या अंगी जणू अंधार सांडला
फिरु फिरु भोवंडून, धराशयी वारा
कोंदल्या अंधारी फुका मनाचा सुस्कारा
सोडला चित्ते ठाव, वृत्ती ही सैरभैर,
उजेडी रिघू आले काळोखे रितेपण
कसा साहू, कसा राहू सांग रिता रिता,
क्षणोक्षणी प्रकाशाला अंधार कवळीता
अबलख मृतप्राय मनीचा तुरंग
आळसल्या खुरांखाली प्रकाश बेचैन
अंधारबंदी आता प्रकाश प्रकाश
तीळ तीळ तुटे माझेपण सावकाश
गगन ओती पाणी, माझी ठिणगी ओली
खोल अंतरात कळ रुतली काळोखी
विझू विझू मन माझे नग्न चिंब ओले
काळोख्या धारेत वाहे रक्त उजेडाचे
गगनी उधाण दावी भय अंतरात
काळोखाच्या ओठी मृत उजेडाचे गीत
काजळल्या डोही उठे अंधार तरंग
कोसळला माझ्यातच आषाढाचा मेघ
रिता रिता वहाता मी पाउस पागोळी
राखू सांग कशी माझी ठीणगी ओलेती

**-- अनुराग कौशिक**

## उत्तेजनार्थ – आईचे डोळे भरले होते



गाडी सुटताना पाहीले,
आईचे डोळे भरले होते
कधी न पाहीलेले माझे,
बालपण सरले होते
विजारीची थिगळे बेसूर हासत होती
गोधडीची किनार, डोळयात ठासत होती
दारी बांधलेल्या शेळया,
मरतुकड्या होत्या
पोटात काही न गेल्याने, पार लुकड्या होत्या
पडकी कोरडी शेते, अवसान गळालेली
मशागत केली तरी दुष्काळात जळालेली
विहीरीचे पाणी आटून डबके झालेले
तळाला दगड गोटे, चिखलात न्हालेले
शेतातल्या पायवाटा, मळून गेलेल्या
आता फिरकणे नाही, कळून गेलेल्या
दारीद्रयाची गोधडी, तिही फाटलेली
डोक्यावर घेतली तर, गुढग्यात छाटलेली
घरातली सगळयांची पोट, खपाटलेली होती
खाईतून बाहेर कस यायचं, विचारानं झपाटलेली होती
आता विचार शहारात जाऊन शिकायचा होता
तेवढ्यासाठी घरदार सगळं विकायचा होता
दोन दिवसाची शिदोरी, बांधून दिली होती
काळजाची चटणी करुन, रांधून दिली होती
जड पावलांनी कसा तरी गाडीत बसलो होतो
आईला वाईट वाटू नये म्हणून खोटं हसलो होतो
गाडी सुटताना पाहीले, आईचे डोळे भरले होते
कधी न पाहीलेले माझे, बालपण सरले होते

**-- हरीश दांगट**

# करुण रस निकाल

## उत्तेजनार्थ – गाव



चला चला दोस्तानो
चला माझ्या गावाकड
वेशीवर मारुतीला
घाला नमून साकड

पुढे जाताना लागती
छोटी घराडी कौलारु
तीथ खेळती वाड्यात
छोटी मैना आणि मोरु



घरामागं मळ्यामंदी
बाप पिकवी श्रीमंती
घाम पिऊन अंगीचा
येती मातीतून मोती

माय थापत बसते
चुलीशेजारी भाकर
कांदा लासनीचा ठेचा
त्यात चवीला खोबर

आजी सांगत बसते
रामा कृष्णाची कहाणी
येतो अवंदून गळा
मनी येता आठवणी

कधी करता विचार
मला प्रश्न हाच पडे
का ही कोपली धरणी
गाव पेटवून सारे



नका येऊ दोस्तानो
आता माझ्या गावाकडं
आता संपल सगल
बाकी मोडकी लाकड

आता काही नाही तीथ
एक भिंत ही पडकी
लटकती खुंटीवर
धुळ भरली फडकी

ढिगा-यात दगड्याच्या
माझ्या बापाची समाधी
माझ्या डोळयात टिप्पूस
गाव अंधरण्या आधी

**-- शंतनू चंद्रात्रे**

## आतिथी संपादक – सौ. संजीवनी बोकील

- एम. ए. (हिंदी) व बी. एड (हिंदी , मराठी) यात सुवर्ण पदक प्राप्त .
- कादंब-या, कथासंग्रह, काव्यसंग्रह, बालकथासंग्रह यांचे लेखन
- व्याकरणावरील पुस्तकाचे लेखन
- पुरस्कार – नांदेड येथील संज़ीवन पुरस्कार, म. का. साहित्य परिषदेचा ग. दि. मा. पुरस्कार, नाट्यसंस्कार पुरस्कार, सकाळ नाट्यवाचन पुरस्कार अशा अनेक पुरस्कारांच्या मानकरी
- अक्षरमैत्र, कॅलिडॊस्कॊप , ह्दयी येता भरते अशा अनेक कार्यक्रमात सहभाग
- दूरदर्शन व आकाशवाणी यासाठी कार्यक्रम लेखन व सहभाग, मान्यवरांच्या मानपत्राचे लेखन, अनेक शाळामधून शैक्षणिक व्याख्याने

## आतिथी संपादकाच्या लेखणीतून –

कवितेच्या अनेक व्याख्या केल्या गेल्या आहेत त्यातली मला सर्वात आवडणारी व्याख्या अशी आहे की "Poetry is, cutting near the aching nerve" अशा प्रकारे जे शब्द काचेच्या पेल्यात भरलेल्या सरबताप्रमाणे स्पष्ट दिसतात तेच भाषेच काव्यरूप !!!

क्रौंच पक्षाच्या वेदनेतूनच कविता अवतरली म्हणूनच "है सबसे मधुर जो गीत जिन्हे हम दर्द के सुर मे गाते है!" आणि म्हणूनच करूणरस ज्यांचा स्थायीभाव आहे अशा काही कवितांमधून तर-तम करण्याची विनंती मान्य करताना मला आनंदच झाला .

हाती आलेल्या कवितांमधून कवितांची निवड करण सोपं होत पण अवघड होतं ते निवडलेल्या कवितांचे श्रेष्ठतेनुसार क्रमांक लावण . एखाद्या कवितेतील एखादी ओळ दंश करून जायची तर एखादी कविता हृदयाला भिजवून टाकायची. निवडलेल्या कविता वाचून निर्णय घेताना "त्रास" झाला एवढ खरं !!

भवभूतीने म्हटलं आहे की "शोकाला श्लोकात्म रूप प्राप्त होतं तेव्हा काव्य जन्माला येतं " हे वाक्य मला आठवल 'रूसला ग विठा' या कवितेत! प्रथम क्रमांकाची ही कविता निवडताना मला थोडासुध्दा विचार करावा लागला नाही . ती समोर आली आणि काळजात घर करून बसली . काळजातील वेदना तितकेच सच्चे रूप घेऊन शब्दात भरता येते जेव्हा ती वेदना तितक्याच सच्चेपणाने समोर ठाकली असेल आणि कवितेने तितक्याच आसक्तीने डॊक्यावर हात ठेवला असेल .अन्यथा सर्वच वेदनांची गाणी झाली असती, वेदना असेल पण शब्द प्रसन्न नसतील तर त्याचा उपयोग नाही कारण वेदनेचे कढ काढलेल्या कविता धंद्यासाठी बेगडी मेकप करून बसलेल्या बायकासारख्या सहज ओळखू येणारच .

जखम झाल्यावर जस रक्त वाहू लागेल तस लेखणी उचलल्यावर सहजपणे उतरणारी कविता कवीचं सच्चेपण जाणण्याची सहक कसोटी आहे त्यावर हा कवी  निखालस उतरलेला आहे .

जसर सहबाई या शायराचा एक सुंदर शेर आहे –

‘खुदा की देन है जिसको नसिब हो जाये ।

हर एक दिला को गमे – जॉवीदा नही मिलता ।
आणि ही देन त्यालाचा मिळते ज्याला प्रेम नावाच बेट लागत, यात असते ती फक्त प्रेमाची धुंद जाणिव,

उत्कटप्रेमाची हीच तहान दुस-या क्रमांकाच्या‘मन कावर बावर’ या कवितेतून उसळताना दिसते . तिच्या एका श्वासासाठी, एका शब्दासाठी यल्गार मांडणारा संवेदनशील आकांत या कवितेत दिसतो .

तिसरा क्रमांक विभागून दिलेला आहे, दोनही कविता बाबांचे चित्र उभे करतात, एक शहरी बाबा आहे तर दुसरा शरणागत शेतकरी बाप, यात साम्य आहे ते दोनही मुलांच्या दुःखात ! वडीलांच्या जाण्यान अचानक आलेल प्रौढ़त्व, पोरकेपण कविंनी नेमक्या शब्दात व्यक्त केल  आहे. आपल्यासोबत आसपासच्या परिवेशाला दुःखात सामिल करून घेण्याचे सामर्थ्य कवीत दिसते .

या खेरीज उत्तेजनार्थ बक्षिससाठी ‘आईचे डोळे भरले होते’ , ‘काजळडोह’ , ‘गाव’ या कविता निवडल्या आहेत.
‘ या हृदयीचे त्या हृदयी घातले’ हे सामर्थ्य या तिनाही कवींमध्ये दिसते, डीटेलिंगचा ओहा सोडून कवितेची खरी वाट शोधायचा प्रयत्न या कवींनी केला तर खूप काही हाती लागेल.
याखेरीज

१) या रक्तावलेल्या हृदयाला
२) का ?
३) माझी जुनी ब्रिफकेस
४) एकटी
५) ईथे
६) शंखतिर्थ
७) पोर

या कवींना माझ्यातर्फे खास शाबासकी, कवितेच्या गावाचा पत्ता तुम्हाला मिळलाय, फक्त वळणवाटा शोधायला हव्यात, एवढच सांगते की सर्वांचे अभिनंदन !!

कवितेच्या एका व्याखेने सुरूवात केली होती, माझ्याच एका व्याख्येने समारोप करते,

‘संवेदनांच्या बाणांची टोक

बाहेर वळली की –
जखमा होतात
आत वळली की

कविता !!!’
मला या निमित्ताने असे आत शिरून काव्यनिर्मितीच्या प्रक्रियेत पुन्हा घुसता आले, काही शोधता आले, काही सुंदर ओळीनी काळीज ओलावले यास्तव धन्यवाद !!

**-संजीवनी बोकील**

## काव्यांजली आणि मराठी कविता तुमच्यासाठी घेऊन येत आहेत

========================================

## नवरस काव्यस्पर्धा मालिका

========================================

यात आहेत साहित्यातील नऊ रस प्रत्येक स्पर्धा एका रसावरील कवितांची
नऊ रस नऊ स्पर्धा एक महामालिकाच म्हणा ना !!!
दर महिन्याला एक रस तब्बल नऊ महिने चालणारे ही धम्माल !!!

काव्यस्पर्धेचा उद्देश 'चढाओढ़'हा नाही,
कोणी छोट - मोठं, कविता चांगली वाईट सिध्द करण हा ही नाही.
ही स्पर्धा आपल्या प्रतिभेला आव्हान आहे, सृजनशक्तीला आवाहन आहे.
निवड्क कविता नेटाक्षरीमध्ये प्रसिध्द होतील. हजारोंपर्यंत जातील. बक्षिसेही असतीलच.

लिहा मंडळी ! बघुया महाराष्ट्राच्या उद्याच्या 'लेखण्या' काय आहेत ते.

========================================

## या महिन्याचा 'रस'विषय 'रौद्ररस'

========================================

तुमच्या १/२ **'रौद्ररस' पूर्ण** कविता आम्हाला १५ जुलै २००९ पर्यंत
**marathikavitamarathispardha@gmail.com**
वर पाठवा.
सोबत आपल्या ओरकूट प्रोफाईलची व ब्लॉगची लिंक नक्की पाठवा.
अधिक माहिती कम्युनिटीवर मिळेल.

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय, नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ३५००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्याव्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करून वाचणाऱ्यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॅारवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतू असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू . मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्यासारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहोचवण्याचा आमचा संकल्प सिद्धीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

**NETAKSHAREE@GMAIL.COM**